मागणी क्र. वाय-२, २२१५- पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५ १८८१) लेखाशीर्षांतर्गत १०-कंत्राटी सेवा या उद्दीष्टाखाली निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बजेट-११२५/प्र.क्र.८६/पापु-२३**

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख : २९ मे, २०२५

वाचा :-

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः जिपआ-२०१६/प्र.क्र.३०१/पापु-२३, दिनांक २८.१२.२०२२
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क., दिनांक २७.०४.२०२२.
३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५
४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.७.०४.२०२५.

प्रस्तावना :-

जिल्हा परिषदांमधील ग्रामीण पाणीपुरवठा विभागातील पदांचा सुधारीत आकृतीबंध दिनांक २८.१२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आला असून, जिल्हा परिषदांतर्गत ग्रामीण पाणीपुरवठा विभागाचे मुख्यालय, यांत्रिकी उपविभाग, देखभाल दुरुस्ती कक्ष तसेच तालुकानिहाय उपविभाग यांच्यासाठी एकूण १७६० पदे बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे.

२. महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ मधील तरतूदीनुसार, लेखाशीर्ष २२१५१८८१ अंतर्गत जिल्हा परिषदांच्या ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या वर्ग ३ व वर्ग ४ च्या कर्मचाऱ्यांना वेतन व वेतनेतर अनुदान उपलब्ध केले जाते. वित्त विभागाच्या दिनांक २७.०४.२०२२ च्या शासन निर्णयातील निदेशानुसार, बाह्ययंत्रणेद्वारा घ्यावयाच्या कामाचे प्रदान "१०-कंत्राटी सेवा" या

शीर्षाखाली दाखविणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने २२१५१८८१ या लेखाशीर्षांतर्गत "१०- कंत्राटी सेवा" या उद्दिष्टांतर्गत सन २०२५-२६ मध्ये वित्त विभागाने अर्थसंकल्पीय संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून संबंधित जिल्हा परिषदांच्या मागणीनुसार निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५१८८१)" या लेखाशिर्षाखालील "१०-कंत्राटी सेवा" या उद्दीष्टाखाली खालीलप्रमाणे एकूण रुपये १७०.०० लक्ष (रुपये एक कोटी सत्तर लाख फक्त ) इतका निधी खालील जिल्हा परिषदेच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांना प्रत्यक्षात भरलेल्या मनुष्यबळाच्या वेतनासाठी वितरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हा परिषद | भरलेल्या मनुष्यबळाची संख्या | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान (रु. लक्ष) | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे एकूण अनुदान अक्षरी रुपये |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | सातारा | २४ | १६.०० | रुपये सोळा लाख फक्त |
| २ | पालघर | २६ | २०.०० | रुपये बीस लाख फक्त |
| ३ | लातूर | २६ | ४२.०० | रुपये बेचाळीस लाख फक्त |
| ४ | परभणी | २४ | ४०.०० | रुपये चाळीस लाख फक्त |
| ५ | नागपूर | ३३ | ३६.०० | रुपये छत्तीस लाख फक्त |
| ६ | गडचिरोली | ३५ | १६.०० | रुपये सोळा लाख फक्त |
| **एकूण** | | **१६८** | **१७०.००** | **रुपये एक कोटी सत्तर लाख फक्त** |

२. उपरोक्त निधी पुढील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे -

(अ) जिल्हा परिषदेने सदर निधीचा विनियोग संदर्भाधीन दिनांक २८.१२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये बाह्ययंत्रणेद्वारे भरावयाच्या मंजूर व अनुज्ञेय (संदर्भाधीन दिनांक २८.१२.२०२२ च्या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र ५ मध्ये नमूद पदांपैकी सध्या कार्यरत पदे वगळून) मनुष्यबळापैकी प्रत्यक्षात भरलेल्या मनुष्यबळाच्या मानधनाकरिताच करावा. अन्य प्रयोजनार्थ या निधीचा विनियोग करण्यात येऊ नये. या निधीचा अन्य बाबींवरील खर्च ही वित्तीय

अनियमितता समजण्यात येईल व अशा कृतीसाठी संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील.

(ब) बाह्ययंत्रणेची पदे भरताना वित्त विभाग शासन निर्णय दिनांक २७.०४.२०२२ व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशातील सूचनांचे पालन करण्याची दक्षता घ्यावी.

३. उपलब्ध करुन दिलेला निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर करावा. संदर्भाधीन दिनांक २८.१२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये मंजूर आकृतीबंधामध्ये नमूद केलेल्या बाह्ययंत्रणेच्या मनुष्यबळाव्यतिरिक्त अन्य कोणताही खर्च या निधीतून करु नये. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४. सदर निधी मनुष्यबळ पुरविणाऱ्या कंत्राटदारास ECS/NEFT द्वारे अदा करण्यात यावा. नियुक्त मनुष्यबळास थेट अदा करु नये.

५. याव्दारे प्राप्त झालेल्या निधीतून आपल्याकडील कंत्राटी कर्मचाऱ्यांचे मानधन अदा केल्यानंतर वर्षअखेरीस शिल्लक राहीलेला निधी शासनास समर्पित करावा.

६. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ७ एप्रिल, २०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात व बीम्सप्रणालीवर उपलब्ध केलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२९१३४७११७७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB B HAJARE

Digitally signed by BALASAHEB B HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB B HAJARE
Date: 2025.05.29 15:49:25 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. विधानसभा सदस्य/ विधान परिषद सदस्य, सर्व

२. विभागीय आयुक्त, ठाणे, पुणे, नाशिक, नागपूर

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा/पालघर/लातूर/परभणी/गडचिरोली/नागपूर

४. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा/पालघर/लातूर/परभणी/गडचिरोली/नागपूर

५. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सातारा/पालघर/लातूर/परभणी/गडचिरोली/नागपूर

६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)

७. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)

८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)

९. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)

१०. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा/पालघर/लातूर/परभणी/गडचिरोली/नागपूर

११. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

१२. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई

१३. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१८)

१४. कक्ष अधिकारी, ग्राम विकास विभाग

१५. कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

१६. निवड नस्ती, कार्यासन पापु-२३